**केंद्र शासन पुरस्कृत आधुनिक वनवणवा व नियंत्रण व्यवस्थापन (एकात्मिक वनसंरक्षण योजना) (आदिवासी क्षेत्र) सन २०१८-२०१९ मधील पहिला हप्ता मंजूरी**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.टिआरएस-०६/२०१७/प्र.क्र.२८३/२/फ-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १६ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-** १) केंद्र शासन, पर्यावरण व वन मंत्रालय, पर्यावरण भवन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३-२३/ २००७-एफपीडी (पीटी.) दिनांक २७.९.२०१७

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-१/सी/यो/प्र.क्र.१/११५३/२०१८-१९, दिनांक १.१०.२०१८

**शासन निर्णय :-**

आधुनिक वनवणवा व नियंत्रण व्यवस्थापन (एकात्मिक वनसंरक्षण योजना), केंद्र शासन पुरस्कृत योजना (आदिवासी क्षेत्र योजना)या योजनेंतर्गत सन २०१८-१९ करिता केंद्र शासनाने संदर्भ क्र.१ अन्वये या योजनेअंतर्गत प्रथम हप्ता म्हणून केंद्र शासनाने रु.६७.७६ लक्ष इतका वितरीत करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार प्रथम हप्ता केंद्र हिस्सा रु.४०.६६ लक्ष (६०%) व राज्य शासनाचा हिस्सा रु २७.१० लक्ष (४०%) इतका आहे. केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये दिनांक २९.०९.२०१८ रोजी जमा झालेला आहे.

योजना क्र.सी-७ अंतर्गत २४०६ वनीकरण व वन्यजीवन, १०२ (११), सामाजिक व क्षेत्र वनीकरण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (११) (१७) आधुनिक वनवणवा नियत्रंण व व्यवस्थापन (२४०६ २०४३) ६०% केंद्रीय अनुदान रु ४०.६६ लक्ष व २४०६ वनीकरण व वन्यजीवन १०२ (११) सामाजिक व क्षेत्र वनीकरण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना केंद्र पुरस्कृत योजना (११) (१८) आधुनिक वनवणवा नियत्रंण व व्यवस्थापन (२४०६ २३७५) ४०% राज्य शासन रुपये २७.१० लक्ष म्हणजेच रु.६७.७६ लक्ष इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे (BDS) वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदान योजनेतील मंजूर कामांवर खर्च करण्यात यावा.

सदर शासन निर्णयान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावातील कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

अ) मान्यता दिलेल्या खर्चाच्या तपशीलवार बाबी केंद्र शासनाने उपरोक्त संदर्भीय पत्रांमध्ये नमूद केल्या आहेत. सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

आ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

इ) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. करुन खरेदी करण्यात यावी.

ई) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व दिनांक ०२.४.२०१८ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

सदर निधी मागणी क्र.सी-७ अंतर्गत २४०६ वनीकरण व वन्यजीवन १०२ (११) सामाजिक व क्षेत्र वनीकरण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना केंद्र पुरस्कृत योजना (११) (१७) आधुनिक वनवणवा नियंत्रण व व्यवस्थापन (२४०६ २०४३) (६० टक्के केंद्र पुरस्कृत) व २४०६ वनीकरण व वन्यजीवन १०२ (११) सामाजिक व क्षेत्र वनीकरण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना केंद्र पुरस्कृत योजना (११) (१८) आधुनिक वनवणवा नियंत्रण व व्यवस्थापन (२४०६-२३७५) (४० % राज्य हिस्सा) च्या सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २.४.२०१८ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१६१४५८४३२११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.10.16 15:02:53 +05'30'

(सुजय दोडल)
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

प्रति,

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वनविकास महामंडळ, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) सर्व,
६) मुख्य वनसंरक्षक, माहिती व तंत्रज्ञान व प्रसिध्दी, प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालय
७) वनसंरक्षक (वन्यजीव), सर्व
८) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
९) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
११) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, अर्थ-६, व्यय-१०, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३) ब-१/फ-२/फ-५ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४) फ-६ कार्यासन (निवड नस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.